**श्री.वि.पां. लोखंडे, सहायक कक्ष अधिकारी यांची सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण विभाग या कार्यालयातील "अधीक्षक (वर्ग-२) (राजपत्रित)" पदावर रुजू करुन घेऊन त्यांना सदर कार्यालयाचे "आहरण व संवितरण अधिकारी" घोषित करणेबाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : नियुक्ती-२०१८/प्र.क्र.९४/गृनिधो-१,**
नविन प्रशासन भवन, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ सप्टेंबर, २०१९.

**संदर्भ** : शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१०४/१४-अ, दि.२९/०८/२०१९.

**शासन आदेश**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन दि.२९ ऑगस्ट,२०१९ च्या शासन आदेशान्वये, म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा, आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे) नियम, १९८१ च्या नियम ४० परिशिष्ट-२ मध्ये विहित केलेल्या प्रतिनियुक्तीच्या विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून, श्री.वि.पां. लोखंडे, सहायक कक्ष अधिकारी यांची गृहनिर्माण विभागातंर्गत सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण विभाग या कार्यालयातील "अधीक्षक (वर्ग-२) (राजपत्रित)" या पदावर प्रतिनियुक्तीने प्रथमत: एक वर्षासाठी नियुक्ती करण्यांत आली आहे.

२. श्री.वि.पां. लोखंडे, सहायक कक्ष अधिकारी हे सद्य:स्थितीत सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण विभाग या कार्यालयात उधार उसनवारी तत्वावर कार्यरत आहेत. सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त आदेशास अनुसरुन, श्री.वि.पां. लोखंडे, सहायक कक्ष अधिकारी यांच्या सेवा या आदेशाद्वारे सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण विभाग, या कार्यालयात "अधीक्षक (वर्ग-२) (राजपत्रित)" या पदावर दिनांक २९ ऑगस्ट, २०१९ (म.पू.) पासून प्रतिनियुक्तीने वर्ग करण्यात येत आहेत. तसेच, श्री.वि.पां. लोखंडे यांना सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा, न्यायालय, कोकण विभाग, या कार्यालयाकरिता "आहरण व संवितरण" अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०९२७१३२६०७९७०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Farooq Ahmed Noorkhan Pathan
Date: 2019.09.27 13:27:18 +05'30'

**( फा. नू. पठाण )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) महालेखापाल १/२, ( लेखापरीक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
२) महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
३) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई,
४) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई,
५) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण विभाग,
६) श्री.वि.पा. लोखंडे, अधिक्षक, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण विभाग,
७) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई,
८) कार्यासन (प्रशा-१), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) निवडनस्ती (गृनिधो-१).